अनुसूचित जातीच्या मुलामुलींना शिक्षणासाठी परदेशी शिष्यवृत्ती योजनेत सुधारणा करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः इबीसी -२०१५/प्र.क्र.६९/शिक्षण-१**
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२
तारीख: १६ जून, २०१५

<u>वाचा -</u>

१) शासन निर्णय सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्रमांकः इबीसी २००३/प्र.क्र.११५/मावक - २, दिनांक ११.०६.२००३
२) शासन निर्णय सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्रमांकः इबीसी २००४/प्र.क्र.१०२/मावक - २, दिनांक ०५.०८.२००४
३) शासन निर्णय सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग क्रमांकः इबीसी २००६/प्र.क्र.३२९/मावक - २, दिनांक १७.०६.२००६
४) शासन निर्णय सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग क्रमांकः इबीसी २०१०/प्र.क्र.१९४/मावक-२ दिनांक १५.०७.२०१०
५) शासन निर्णय सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग क्रमांकः इबीसी २००९/प्र.क्र.१०३/मावक-२ दिनांक २२.१०.२०१०
६) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांकः इबीसी २०१३/प्र.क्र.११/शिक्षण-१ दिनांक १०.०१.२०१३
७) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांकः इबीसी २०१३/प्र.क्र.१४१/शिक्षण-१ दिनांक ०८.०८.२०१३
८) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांकः इबीसी २०१३/प्र.क्र.१४१/शिक्षण-१ दिनांक २८.११.२०१३
९) आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्रमांक सकआ/शिक्षण/परदेश निवड समिती इतिवृत्त/२०१४-१५/का-४/१४३० दिनांक १०.०६.२०१४
१०) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांकः इबीसी २०१४/प्र.क्र.८२/शिक्षण-१ दिनांक १२.०९.२०१४
११) आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्रमांक सकआ/शिक्षण/ परदेश शिष्यवृत्ती/८८७/जाहिरात/२०१५-१६/का-४, दिनांक २१.०४.२०१५

<u>प्रस्तावना -</u>

उपरोक्त शासन निर्णय दिनांक ११.०६.२००३ व दिनांक ०५.०८.२००४ अन्वये अनुसूचित जातीच्या विद्यार्थ्यांना परदेशात नामांकित शिक्षण संस्थेत शिक्षणाची संधी मिळावी याकरीता परदेशी शिष्यवृत्ती योजना लागु करण्यात आली आहे. तसेच या योजनेच्या नियमावलीत वेळावेळी सुधारणा करण्यात आली आहे. सदर नियमावलीतील काही बाबींमध्ये सुधारणा करण्याचा प्रस्ताव आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांनी उपरोक्त दिनांक २१.०४.२०१५ च्या पत्राद्वारे सादर केला होता. त्यानुसार नियमावलीत सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय** -

अनुसूचित जातीच्या विद्यार्थ्यांसाठीच्या परदेशी शिष्यवृत्ती योजनेच्या पात्रतेच्या अटी व शर्ती मध्ये पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे:-

१) विद्यार्थ्यांच्या पालकांचे/ कुटूंबाचे व विद्यार्थी नोकरी करीत असल्यास त्याचे स्वत:चे उत्पन्न धरुन सर्व मार्गानी मिळणारे वार्षिक उत्पन्न रु.६.०० लाखापेक्षा जास्त नसावे.

२) ज्या परदेशी विद्यापीठांचे जागतिक रँकिंग (Latest QS World Ranking) **३००** पर्यंत आहे, अशाच विद्यापीठात प्रवेश मिळालेले विद्यार्थी या योजनेसाठी पात्र राहतील. (जाहिरातीच्या वेळी असणारे विद्यापीठाचे रेटिंग गृहीत धरण्यात यावे.) मात्र निवड ही मेरीटनुसारच होईल.

३) परदेशी शिष्यवृत्तीसाठी जागतिक क्रमवारीमध्ये पहिल्या १०० मध्ये (QS World Ranking TOP १००) असणाऱ्या परदेशी विद्यापीठामध्ये तसेच लंडन स्कुल ऑफ इकोनॉमिक्समध्ये प्रवेश घेणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी उत्पन्नाची मर्यादा लागु राहणार नाही.

४) परदेशी विद्यापीठामध्ये उच्च शिक्षणासाठी प्रवेश घेण्यासाठी GRE (Graduate Record Examination), तसेच TOFEL (Test of English as a Foreign Language) / IELTS (International English Language Testing System) या प्रवेश परिक्षा घेतल्या जातात. सदर GRE च्या आधारावर प्रवेश घेणाऱ्या व TOFEL/ IELTS उत्तीर्ण असणाऱ्या विद्यार्थ्यांचा विशेष विचार करण्यात येईल.

५) निवड समितीच्या बैठकीपूर्वी विद्यार्थ्यांने शिष्यवृत्तीसाठी केलेल्या अर्जामध्ये नमूद केलेले विद्यापीठ व अभ्यासक्रम यामध्ये विद्यार्थ्यांची शिष्यवृत्तीसाठी निवड झाल्यावर कोणत्याही परिस्थितीत बदलता येणार नाही. परंतु काही कारणास्तव विद्यार्थ्यास त्याची निवड झालेल्या अभ्यासक्रमास त्यावर्षी प्रवेश घेता आला नाही, तर त्यास पुढील वर्षीच्या परदेशी शिष्यवृत्तीसाठी नव्याने अर्ज करण्याची मुभा राहील.

६) सदर शिष्यवृत्तीसाठी पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमासाठी २६ व पी.एच.डी. अभ्यासक्रमासाठी २४ विद्यार्थ्यांची निवड करावयाची असून प्रत्येक शाखा/ अभ्यासक्रमनिहाय किती विद्यार्थ्यांची निवड करावयाची याबाबत शासन निर्णय दि.२२.१०.२०१० मध्ये खालीलप्रमाणे विभागणी केली आहे :-

| अ.क्र. | शाखा/ अभ्यासक्रम | पदव्युत्तर पदवी | डॉक्टरेट (Ph.D) |
|---|---|---|---|
| १ | कला | -- | १० |
| २ | वाणिज्य | -- | ४ |
| ३ | विज्ञान | -- | ६ |
| ४ | व्यवस्थापन (Management) | ८ | -- |
| ५ | अभियांत्रिकी | १० | ४ |
| ६ | वैद्यकिय | ८ | -- |
| | **एकूण** | **२६** | **२४** |

वरील विभागणीनुसार काटेकोरपणे विद्यार्थ्यांची निवड करण्यात यावी. त्यात कोणत्याही परिस्थितीत निवड समितीस बदल करता येणार नाही. त्याचप्रमाणे पदव्युत्तर पदवी व पी.एच.डी. करीता विहित करण्यात आलेल्या जागेवर उमेदवार उपलब्ध न झाल्याच्या कारणास्तव सदर जागा आंतरपरीवर्तनीय (Interchangeable) करता येणार नाही.

२. उपरोक्त सुधारणा व्यतिरिक्त उर्वरित नियम, अटी व शर्ती पूर्वीप्रमाणेच राहतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६१६१५५९४५८६२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pratap P Lubal

Digitally signed by Pratap P Lubal
DN: CN = Pratap P Lubal, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.06.18 12:13:21 +05'30'

**(प्र.पां.लुबाळ)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) मा. मंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव
३) मा.राज्यमंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव
४) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
५) प्रधान सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधीद्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
७) आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) संचालक, वैद्यकीय शिक्षण संचालनालय, मुंबई
९) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई
१०) उप सचिव (शिक्षण-१), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
११) शिक्षण -१ (निवडनस्ती)